| | |
|---|---|
| **Convertion in Regular Temparary Establishment:-Shri.Vishvanath G. Bolegave working under Superintending Engineer, Usmanabad Irrigation Circle, Usmanabad.** | **कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदाचे अस्थायी आस्थापनेवरील पदामध्ये रुपांतरण अधिक्षक अभियंता,उस्मानाबाद पाटबंधारे मंडळ, ,उस्मानाबाद-श्री.विश्वनाथ गोविंद बोळेगावे, मजूर** |

# महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एसयुटी-२००६/(२०१/०६)/आ (कामगार )
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांकः- ३०.०४.२०११

पहावेः-:१) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रः- रु.अ.आ- १५९६/२२८/ सेवा- ५,दिनांक २४.४.२००१.

२) अधिक्षक अभियंता,उस्मानाबाद पाटबंधारे प्रकल्प मंडळ यांचे पत्र क्रःउपामंऊ/ आस्था-३/५४६७/सह, दिनांक-०१.०९.२०१०.

**प्रस्तावना :-**

श्री.विश्वनाथ गोविंद बोळेगावे हे अधीक्षक अभियंता, उस्मानाबाद पाटबंधारे मंडळांतर्गत सन १९७९ ते १९९२ या कालावधीत वेगवेगळया कालावधीत 'मजूर' पदी कार्यरत होते. काम उपलब्ध नसल्याने दि.१६.८.९२ रोजी तोंडी आदेशान्वये श्री.बोळेगावे यांना कामावरुन कमी करण्यात आले.सदर सेवाकपाती विरुध्द श्री.बोळेगावे यांनी मा.द्वितीय कामगार न्यायालय, सोलापूर येथे दावा क्र.युएलपी ३६४/९२ दाखल केला. सदर दाव्याचा निर्णय दिनांक १०.९.९८ रोजी होवून श्री.बोळेगावे यांना सेवासातत्यासह व मागील वेतनाच्या पूर्ण थकबाकीसह कामावर घेण्याचा निर्णय देण्यात आला. मा.द्वितीय कामगार न्यायालय, सोलापूर यांच्या उपरोक्त दिनांक १०.९.९८ च्या निर्णयानुसार सदर निर्णयाचा अवमान होवू नये म्हणून श्री.बोळेगावे यांना दिनांक २७.११.९८ रोजी पुन्हा सेवेत घेण्यात आले. मा.द्वितीय कामगार न्यायालयाच्या निर्णयाविरुध्द शासनाचे वतीने मा.औद्योगिक न्यायालय, सोलापूर येथे रिव्हीजन अर्ज क्रमांक ११३/९८ दाखल करण्यात आला. सदर रिव्हीजन अर्जाचा निर्णय दिनांक १९.७.२००३ रोजी होवून 'जलसंपदा विभाग हा उद्योग या संज्ञेत मोडत नाही' या मुद्याच्या आधारे मा.औद्योगिक न्यायालयाने मा.द्वितीय कामगार न्यायालय, सोलापूर यांचा उपरोक्त दिनांक १०.९.९८ चा निर्णय रद्बातल ठरवला.

श्री.बोळेगावे यांना पुन्हा दिनांक १०.११.२००३ च्या आदेशान्वये सेवेतून कमी करण्यात आले. त्याविरुध्द श्री.बोळेगावे यांनी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट पिटीशन क्रमांक ४१२३/२००४ दाखल केले. सदर रिट पिटीशन मध्ये दिनांक २२.८.२००५ रोजी निर्णय होवून मा.उच्च न्यायालयाने मा.औद्योगिक न्यायालय, सोलापूर यांचा उपरोक्त दिनांक १९.७.२००३ चा आदेश रद्द करुन सदर प्रकरण पुन्हा फेरविचारार्थ मा.औद्योगिक न्यायालय, सोलापूर येथे पाठविले. त्यानंतर हा दावा मा.औद्योगिक न्यायालय, लातूर येथे वर्ग करण्यात आला.

त्यानुसार मा.औद्योगिक न्यायालय, लातूर येथे रिव्हीजन अर्ज क्रमांक १/०६ (जुना क्रमांक ११३/९८) प्रकरणी दिनांक ९.८.२००६ रोजी निर्णय होवून सदर रिव्हीजन अर्ज फेटाळण्यात आला व मा.द्वितीय कामगार न्यायालय, सोलापूर यांचे दिनांक १०.९.९८ चे आदेश कायम करण्यात आले.मा.औद्योगिक न्यायालय, लातूर यांच्या उपरोक्त दिनांक ९.८.२००६ च्या आदेशाविरुध्द शासनाचे वतीने मा.उच्च न्यायालय खंडपीड औरंगाबाद येथे रिट पिटीशन क्रमांक ६३७९/२००६ दाखल करण्यात आले. सदर रिट पिटीशनचा निर्णय दिनांक २०.९.२००६ रोजी होवून त्यानुसार मा.कामगार व औद्योगिक न्यायालयाच्या निर्णयात सुधारणा करण्यात येवून श्री.बोळेगावे यांना सेवासातत्यासह कामावर घ्यावे व दिनांक १६.८.९२ ते दिनांक १०.९.९८ व दिनांक १०.११.२००३ ते सेवेत पुनर्स्थापित करेपर्यंतच्या कालावधीतील ५० टक्के वेतनाची थकबाकी अदा करण्याचा निर्णय देण्यात आला.

मा.उच्च न्यायालयाच्या उपरोक्त दिनांक २०.९.२००६ च्या निर्णयाविरुध्द शासनाचे वतीने द्विसदस्यीय खंडपीठासमोर एल.पी.ए.क्र.५५/०६ दाखल करण्यात आले. सदर प्रकरणाचा अंतिम न्यायनिर्णय दिनांक २६.४.२००७ रोजी होवून त्यानुसार श्री.विश्वनाथ गोविंद बोळेगावे यांना न्यायनिर्णयापासून एक महिन्याच्या आत कामावर घेवून मागील वेतनाची थकबाकी तीन महिन्यांच्या आत अदा करण्याचा निर्णय झाला. त्यानुसार सचिव समितीच्या चक्रीय पध्दतीने दि.२२.०६.२००७ रोजी मिळालेल्या मान्यतेनुसार शासनाचे पत्र क्र-एसयुटी २००६/(२०१/२००६) आ(कामगार), दि-२२.०६.२००७ अन्वये श्री.बोळेगावे यांना सेवेत पुनःस्थापित करण्याचे आदेश झाले. शासनाच्या आदेशाप्रमाणे श्री.बोळेगावे दि.१२.०७.२००७ रोजी कामावर हजर झाले. उपरोक्त दिनांक २६.४.२००७ च्या न्यायनिर्णयाविरुध्द शासनाचे वतीने महामंडळाच्या कायदे सल्लागारामार्फत मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेली एस.एल.पी.क्रमांक-५९१९/०७ दि-१९.०७.२००७ रोजी फेटाळण्यात आली. तसेच श्री.बोळेगावे यांनी त्यांना न्यायनिर्णयानुसार कामावर घेण्यात आले नाही म्हणून मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेली अवमान याचिका क्रमांक ६३/२००७ मागे घेतल्यामुळे खारीज करण्यात आली.

श्री.बोळेगावे हयानी शासकीय सेवेत कायम करुन नियमितपणाचे लाभ मिळण्याकरिता मा.औदयोगिक न्यायालय,लातुर येथे दाखल केलेले युएलपी क्र.-६८/०७ चा दिनांक-०७/०८/२०१० रोजी निकाल झाला असून श्री.बोळेगावे हयांना नियमितपणे चौकीदारपदी नोव्हेंबर १९९८ पासून घेण्यात यावे, असा निर्णय दिला. तसेच श्री.बोळेगावे हयांना नोव्हे १९९८ ते दि.०९.११.२००३ पर्यतची पूर्ण थकबाकी व त्यानंतर दि.१०.११.२००३ ते दि.०३.०७.२००७ पर्यंतचे ५० टक्के वेतनातील फरक अदा करण्यात यावा आणि श्री.बोळेगावे हयानी मा.औदयोगिक न्यायालय,लातुर येथे दाखल केलेल्या तक्रारीच्या दिनांकापासून म्हणजेच दि.२९.११.२००७ पासून प्रत्यक्ष आर्थिक लाभ अदा करेपर्यंत ६ टक्के दराने श्री.बोळेगावे हयांना व्याजासह वेतनातील फरक अदा करण्याचा निर्णय दिला. यानुसार मा.औदयोगिक न्यायालय,लातुर यांच्या निर्णयाप्रमाणे श्री.बोळेगावे हयांना चौकीदारपदी रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णयः-</u>**

अधिक्षक अभियंता, उस्मानाबाद पाटबंधारे मंडळ अंतर्गत श्री.विश्वनाथ गोविंद बोळेगावे, चौकीदार यांना त्यांच्या नावांसमोर दर्शविल्याप्रमाणे त्यांनी धारण केलेले तत्सम पद खालीलप्रमाणे अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यात येत आहे.

| अ क्र. | कर्मचा-याचे नांव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.विश्वनाथ गोविंद बोळेगावे, | रोजंदारी | मजूर | ०१/११/१९९८ | चौकीदार | रु.२५५०- ३२०० (५ वा वेतन आयोग) |

३ श्री.विश्वनाथ गोविंद बोळेगावे,यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदाकरीता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान / कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांच्या बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यात येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशीव्यतिरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यात येत आहे.

४ अधिक्षक अभियंता, उस्मानाबाद पाटबंधारे मंडळ यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत, याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत निर्गमित करून ते संबंधित कर्मचा-याच्या निदर्शनास आणावेत. तपशीलामध्ये संबंधित कर्मचा-यांचे नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्याचा दिनांक,इत्यादी बाबी नमूद कराव्यात.त्यामध्ये कोणतीही चूक अथवा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिका-याने अशी बाब तात्काळ शासनाच्या निदर्शनास आणावी. क्षेत्रिय अधिका-याने सदर आदेशात स्वत:च्या अधिकारात कोणतेही फेरबदल करू नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचा-यांच्या व्यक्तिश: निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशाच्या बाबतीत संबंधित कर्मचा-याची (नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याचा दिनांकात दुरूस्ती इत्यादी बाबी) कोणतीही तक्रार नसल्यास त्यांच्याकडून तशा आशयाचे प्रपत्र "ब"मधील दिलेल्या नमुन्यात हमीपत्र (Undertaking )घेऊन ते त्या कर्मचा-याच्या सेवापटात / सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत शासनाला सादर केला जाईल, याबाबत संबंधित अधीक्षक अभियंत्यानी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत / त्रुटी असल्याची संबंधित कर्मचा-याची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरूपात घेण्यात यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरूस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत शासनास सादर केला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरूस्ती प्रस्ताव पाठविताना संबंधित कर्मचा-याच्या नेमणूकांच्या आदेशांच्या प्रती, नाममात्र हजेरीपटाच्या प्रती आणि सेवापट पाठविण्याची दक्षता घ्यावी.

५ श्री.विश्वनाथ गोविंद बोळेगावे,यांची वेतननिश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी. तसेच श्री.बोळेगावे हयांना नोव्हे १९९८ ते दि.०९.११.२००३ पर्यतची पूर्ण थकबाकी व त्यानंतर दि.१०.११.२००३ ते दि.०३.०७.२००७ पर्यंतचे ५० टक्के वेतनाची थकबाकी अदा करण्यात यावी आणि श्री.बोळेगावे हयांना मा.औदयोगिक न्यायालय,लातूर येथे दाखल केलेल्या तक्रारीच्या दिनांकापासून म्हणजेच दि.२९.११.२००७ पासून प्रत्यक्ष आर्थिक लाभ अदा करेपर्यंत वेतन फरकातील थकबाकीवर ६ टक्के दराने व्याजासह वेतनातील फरक रोखीने / धनादेशाद्वारे अदा करण्यात यावा.

६ या आदेशान्वये रूपांतरीत करण्यात आलेल्या कर्मचा-यांच्या वेतनापोटी होणारा खर्च सन २०११ ते २०१२ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशीर्षाखालील मंजूर अनूदानातून भागविण्यात यावा.

७ हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. रूअआ- १५९६/२२८/सेवा -५, दिनांक २४.०४.२००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून काढण्यात येत आहे.

८ हा शासन निर्णय www.maharastra.gov.in हया संकेत स्थळावर २०११०४३०१६५९५३००१ हया सांकेतांक क्रमांकावर प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

**( डॉ. माधव वीर )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत सहपत्रासहित अग्रेषित :-
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२, नागपूर
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२, नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, उस्मानाबाद
वित्त विभाग, (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई-४०००३२
अधिक्षक अभियंता, उस्मानाबाद पाटबंधारे मंडळ, उस्मानाबाद
कार्यकारी अभियंता, पाटबंधारे प्रकल्प मजबूतीकरण विभाग,उमरगा
निवडनस्ती /आस्थापना (कामगार ) संग्रहार्थ